।।श्री योगेश्वरी प्रसन्न।। ।। श्री व्याडेश्वर प्रसन्न ।।

# श्री योगेश्वरी मंदिर निर्माण समिती

**मु. कोंढाणे, पो. कोंदिवडे, ता. कर्जत, जि. रायगड. पिन - ४१० २०१.**

**समस्त श्री योगेश्वरी देवी भक्तांना सादर प्रणाम,**

गेली दोन वर्षे ज्याचा आम्ही ध्यास घेतला होता त्या महत्वाकांक्षी मंदिर प्रकल्पाचा पहिला आणि सर्वात महत्वाचा टप्पा अर्थात मंदिर बांधून त्यात श्री देवी योगेश्वरी व श्री देव व्याडेश्वर या देवतांची प्राणप्रतिष्ठा करणे, पूर्ण झाला आहे. आज मंदिरात दैनंदिन धार्मिक कार्यक्रम यथासांग होत आहेत. प्राणप्रतिष्ठा झाली त्या दिवसापासून आजपर्यंत किमान १००० चित्पावन कुटुंबांनी दर्शनाचा लाभ घेतला व हे प्रमाण कलेकलेने वृध्दिंगत होत आहे. येणाऱ्या भक्तांना जास्तीत जास्त सुविधा उपलब्ध करुन देणे हाच आमचा संकल्प असून त्यासाठी आम्ही व कार्यकर्ते सतत कार्यमग्न आहोत. परिणामी येणारी भक्तमंडळी तृप्त मनाने व आनंदी चेहऱ्याने जाताना दिसतात. प्रमुख कार्य समाधानकारक व यशस्वी झाले आहे. आता पुढील टप्प्यातील भावी काळातील आमच्या योजना काय आहेत याचा उहापोह आज आम्ही करु इच्छितो.

कर्जत रेल्वे स्थानकापासून मंदिरापर्यंत येण्या-जाण्याची सुलभ यातायात व्यवस्था असणे ही गोष्ट अत्यंत महत्वाची असून ती प्राधान्याने कार्यान्वित करण्यासाठी आम्ही प्रयत्नशील आहोत.

मंदिराचे पुढे एक भव्य सभा मंडप असणार आहे, ज्याची लांबी ८० फुट तर रुंदी ५० फुट असेल. सभामंडप झाल्यावर नियमितपणे भजन, किर्तन, प्रवचन इत्यादी कार्यक्रमांचे आयोजन करता येईल. येथेच कुलमंडळे आपली वार्षिक संम्मेलने घेऊ शकतील. तसे झाल्यास भक्त निवास अधिक मोठे करावे लागेल.

दूर अंतराहून येणाऱ्या भक्तांसाठी निवास व्यवस्था आवश्यक आहे त्यासाठी छोटे भक्त निवास बांधण्याची आमची योजना आहे. जवळच्या भक्तांना त्याची फारशी गरज भासणार नाही.

मंदिर परिसरात गुरूकुल धर्तीवर एक वेदपाठशाळा चालवण्याचा आमचा प्रयत्न राहिल. त्यामुळे भावी काळात पौरोहित्य करणाऱ्या व्यक्ती अधिक मात्रेने उपलब्ध होतील.

हा संपूर्ण प्रकल्प उत्तरवाहिनी उल्हास नदीकिनारी साकार होणार आहे. म्हणूनच नदीवर घाट बांधायची औचित्यपूर्ण योजना आहे.

मंदिराच्या मागील बाजूस असलेल्या आमराई जवळच एक छोटेखानी श्री दत्तमंदिर बांधण्याची आमची योजना आहे.

या एकूण प्रकल्पामुळे सर्व ब्राह्मण कुटुंबांना कुलधर्म, कुलाचार व इतर धार्मिक कृत्ये तसेच निवास, भोजन इ. सुविधा कुलमंडळांसाठी सभा, संम्मेलन, आधुनिक वृध्दाश्रम, होतकरुंसाठी वेदपाठशाळा या व इतर अनेक गोष्टी (सहलीसुध्दा) एकाच ठिकाणी व त्या सुद्धा आपल्या आराध्य देवतांच्या सान्निध्यात उपलब्ध होतील. तसेच वर-वधु सुचक मंडळ व बेरोजगारांना नोकरीसाठी प्रयत्न करत आहोत.

या सर्व गोष्टींचे नियोजन करीत असताना आम्ही आपली समाजाप्रत बांधिलकी व कर्तव्ये याकडे दुर्लक्ष केलेले नाही. मंदिराजवळ वसलेल्या छोट्या गावात अंदाजे ३० घरे आहेत. तेथील-

शाळकरी मुलामुलींना आम्ही दररोज मोफत दुध देतो.

लवकरच आमचे सहा गोबरगॅस प्लँट तयार झाल्यावर तेथाल घरांना विनामुल्य गॅस पुरविण्यात येणार आहे.

सर्व रोजगार कामावर स्थानिकांना प्राधान्य दिले जाते.

एक प्राथमिक उपचार केंद्र व वैद्यकीय सल्ला केंद्र, लवकरच चालू करण्याचा आमचा प्रयत्न आहे. यात रुग्णवाहिका सेवेचा अंर्तभाव असेल.

वरील निवेदनावरुन आपल्या लक्षात येईल की या योजनांचा आवाका मोठा आहे, व हे काम सर्वांच्या सहकार्यानेच होऊ शकते. आपण याचा अभ्यास करावा व आपले विचार आणि प्रतिक्रिया आम्हाला कळवाव्यात. आम्हाला न सुचलेल्या काही योजना असल्यास त्याही कळवाव्या व त्यात आपला सहभाग कसा असेल हेही स्पष्ट करण्यास विसरु नये. आम्ही आपल्याकडून अनेकविध मार्गाने सहकार्याची अपेक्षा करीत आहोत.

याशिवाय इतर अन्य कोणत्याही पद्धतीने आपण या कार्यात सहभागी होऊ इच्छित असाल तर लवकरात लवकर प्रत्यक्ष भेटीचे आयोजन करावे म्हणजे शिघ्र कृती करता येईल.

आपणांस वरील योजनेसंबंधी अधिक माहिती गरजेची वाटल्यास मंदिराचे ठिकाणी स्वत: येऊन श्री. अनिल दत्तात्रय गोगटे यांच्याशी चर्चा करावी. प्रकल्पाविषयी सर्व माहिती कोणासही उपलब्ध होईल. आम्ही या पत्रकाद्वारे सर्व चित्पावन व्यक्ती, कुळमंडळे, चित्पावनांच्या हितवर्धक संस्था, यांना विनम्र आवाहन करीत आहोत की, या मोठ्या प्रकल्पास सर्वतोपरी सहाय्य करुन एकजूटीचे दर्शन सर्व समाजास घडू द्यावे.

श्री देवी योगेश्वरी मातेचा व व्याडेश्वर देवाचा आशिर्वाद आपल्या पाठीशी आहेच.

धन्यवाद! शुभं भवतू!

**श्री. दिगंबर शिवराम गोगटे, पुणे**
**९८२३९३२०५४**

**श्री. अनिल दत्तात्रय गोगटे, कोंढाणे-कर्जत**
**९२७१६१८१८४/८३/८५**



श्री योगेश्वरी व
श्री व्याडेश्वर मंदिर
कोंढाणे
कोंढाणे गांव
सालपे कडे
सांडशी
कोंदिवडे
खांडपे
उल्हास नदी
सांगवी
तमनाथ
शिरसे
कोंदिवडे रोड
जांभिवली कडे
मुरबाडकडे
कर्जत शहराकडे
कर्जत शहराकडे
मुद्रे गाव
भिसेगांव
नेरळ कडे
चौक कर्जत फाटा
पुणे
मुंबई